**<u>ॲड.श्री.उज्वल निकम,विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.</u>**
**धुळे जिल्ह्यातील पिंपळनेर पोलीस स्टेशन येथील गु.र.क्र.७४/२०१८ (राईनपाडा प्रकरण) या खटल्यात मा.सत्र न्यायालय,धुळे येथील न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०९१८/प्र.क्र.३२२/पोल-१०**
२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजुगुरु चौक
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ नोव्हेंबर,२०१८

**<u>संदर्भ:-</u> शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी २०१८/यु.ओ.आर.८४/डी-१४, दिनांक ०५/१०/२०१८.**

**<u>शासन निर्णय:-</u>**

धुळे जिल्ह्यातील पिंपळनेर पोलीस स्टेशन येथील गु.र.क्र.७४/२०१८ (राईनपाडा प्रकरण) या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यात मा.सत्र न्यायालय, धुळे येथे न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता ॲड.श्री.उज्वल निकम, विशेष सरकारी अभियोक्ता यांची विधि व न्याय विभागाने उपरोक्त दि.०५/१०/२०१८ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम,विशेष सरकारी अभियोक्ता यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| i. | प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - ₹५०,०००/- |
| ii. | विचारविनिमय फी (प्रतितास)<br>(कमाल मर्यादा प्रतिदिन ₹५०,०००/-) | - ₹१५,०००/- |
| iii. | हॉटेलचा खर्च प्रतिदिन | - ₹५,०००/- |
| iv. | प्रवास खर्च | - रेल्वेचा प्रत्यक्ष प्रवास खर्च |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.उज्वल निकम,विशेष सरकारी अभियोक्ता यांना उपरोक्त फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, "२०५५-पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१), जिल्हा पोलीस दल-(२०५५ ०१६८), २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०६/१८/व्यय-७, दिनांक २३/१०/२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८१११९१५३३२६५३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d,
serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.11.19 15:39:23 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
उप सचिव (विधि),गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
   आपणांस विनंती करण्यात येते की, प्रस्तुत प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड.श्री.उज्वल निकम यांना अंतिमत: अदा करण्यात आलेल्या फी च्या एकूण रक्कमेची सविस्तर तपशिलवार माहिती शासनास उपलब्ध करुन द्यावी.
२. विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
३. पोलीस अधीक्षक,धुळे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१/२,महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी,धुळे.
८. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
१०. ॲड.श्री.उज्वल निकम, ४८, बॅरीस्टर निकम चौक,जि.जळगांव-४२५ ००१.
११. निवडनस्ती (पोल-१०).